**महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पाअंतर्गत कृषि व्यावसायिकेतर आधारीत उपक्रमांच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा व राज्यस्तरीय समिती नियुक्त करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभगा,
शासन निर्णय क्रमांक :- जसुप्र ५४१०/प्र.क्र.२९४/३-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १० नोव्हेंबर, २०१०.

**संदर्भ-** शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक
१) जसुप्र -५४०५/प्र.क्र.१४४/३-अे, दिनांक ७ डिसेंबर, २००५
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र.कृआ/मजसुप्र/वि.प्र.५/नाप्र-/१२२/१०-११ दि.४ सप्टेंबर, २०१० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्याचे आता केवळ कृषि उत्पादन वाढविणे हे एकमेव प्राथम्य राहीले नसून, उत्पादनाचा दर्जा वाढविणे, उच्च मूल्यांकीत पिकांच्या माध्यमातून पिक फेररचना, पाण्याचा सुयोग्य आणि काटेकोर वापर याव्दारे शेतक-यांचे उत्पादन, उत्पादकता आणि उत्पन्न वाढविणे यावर भर देण्याचे धोरण विचारात घेऊन **जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पाअंतर्गत कृषि विभागाचा कृषि सहाय्यता सेवा घटक राबविण्यात येत आहे**. या घटकामध्ये कृषि व्यावसायिकेतर आधारीत प्रकल्पाचे प्रस्ताव तयार करण्यासाठी कृषि आयुक्तालयाने सन २०१०-११ मध्ये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्या मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून कृषि व्यावसायिकेतर आधारीत उपक्रमांच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा व राज्यस्तरीय समिती नियुक्त करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रकल्पाधारीत उद्योग विकास करण्यासाठी नाविन्यपूर्ण प्रकल्प राबविण्याचे प्रस्तावित आहे. याबाबत कृषि आयुक्तालय, पुणे महाराष्ट्र जलसुधार प्रकल्पांतर्गत यांनी सन २०१०-११ करिता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनेंच्या अधिन राहून त्यामध्ये नमूद केलेल्या विषयावर आधारीत प्रकल्प राबविण्याकरिता जिल्हा व राज्यस्तरीय समितीची नियुक्ती करण्यास खालीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**जिल्हास्तरीय निवड समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | अध्यक्ष |
| २ | कार्यकारी अभियंता जलसंपदा विभाग | सदस्य |
| ३ | कृषि उपसंचालक, संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय | सदस्य सचिव |
| ४ | अग्रणी बँकेचे प्रतिनिधी (Lead bank manager) | सदस्य |

**राज्यस्तरीय निवड समिती खालील प्रमाणे आहे.**

| | | |
|---|---|---|
| १ | कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) | अध्यक्ष |

| | | |
|---|---|---|
| २ | अधिक्षक अभियंता डीआयआरडी | सदस्य |
| ३ | कृषि सहसंचालक, (विप्र २) | सदस्य |
| ४ | कृषि उपसंचालक, पीपीएमयू) | सदस्य |
| ५ | कृषि उपसंचालक, (विप्र ५) | सदस्य सचिव |
| ६ | राज्यस्तरीय अग्रणी बँकेचे प्रतिनिधी/ व्यवस्थापक | सदस्य |

**३.** कृषि व्यावसायिकतेवर आधारीत उपक्रमांच्या अंमलबजावणीसाठी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनेमध्ये नमूद केलेल्या विविध विषयांची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) तथा नोडल अधिकारी महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प कृषि आयुक्तालय, पुणे यांनी योग्य ती दक्षता घ्यावी. तसेच याबाबतचा प्रगती अहवाल शासनामार्फत जागतिक बँकेकडे सादर करावयाचा असल्याने मासिक /त्रैमासिक प्रगती अहवाल विहित विवरण पत्रात तसेच विहीत कालावधीत शासनास सादर करावा.

**४.** हा शासन निर्णय प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१११८१४५३५००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वीणा राऊत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.**

प्रति,

कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठे,
सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त कृषि महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व विधानमंडळ सदस्य/१० प्रति विधानमंडळ ग्रंथालय
सर्व जिल्ह्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिक्षक अभियंता, प्रकल्प तयारी व व्यवस्थापन कक्ष,मजसुप्र, जलसंपदा विभाग,
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), तथा नोडल अधिकारी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ जादा प्रतींसह)
संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
सर्व संचालक/ कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,

सर्व जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, पुणे, नाशिक
कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती, खोपोली (जि.रायगड), नागपूर
माहिती व जनसंपर्क संचालनालय, (५ प्रतिंसह)
महालेखाकार, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
महालेखाकार, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
सर्व सहसचिव /उपसचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग
निवड नस्ती